**अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे अंतर्गत धोम पाटबंधारे विभाग, सातारा अंतर्गत तारळी व उत्तरमांड उपसासिंचन शाखा, तारळी व लघु पाटबंधारे तलाव व कोल्हापूर पध्दतीचे बंधारे शाखा, सातारा कार्यान्वित करण्यास मंजुरी देण्याबाबत---**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय,क्रमांक : संकीर्ण-१०१०/(१३४/२०१०)/लाक्षेवि (आस्था)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक : २९ सप्टेंबर, २०११**

**प्रस्तावना :-**

अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे यांचे अधिनस्त असणा-या धोम पाटबंधारे विभाग, सातारा यांचे अंतर्गत सिंचन व्यवस्थापनाचे काम सुरळीतपणे व व्यवस्थित नियोजन करण्यासाठी आणि प्रशासकीय कामाची निकड तसेच लोकप्रतिनिधींची मागणी विचारात घेवून, तारळी व उत्तरमांड उपसासिंचन शाखा, तारळे व लघु पाटबंधारे व कोल्हापूर पध्दतीचे बंधारे शाखा, सातारा कार्यान्वित करणेबाबतचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी त्यांचे कार्यालयीन पत्र जा.क्र.मकृखोविम/आ-३/(६६/०८)/०५९६, दि.२५/१/२०११ अन्वये शासनास सादर केला आहे.

२. वरील पार्श्वभूमीवर स्थानिक शेतक-यांच्या सोयीसाठी सध्याची कृष्णानदी उपसा सिंचन शाखा, उंब्रज व कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.५, बोरगांव या शाखेचे प्रशासकीय कामाच्या सोयीसाठी व सिंचन व्यवस्थापन व्यवस्थित होण्यासाठी विभाजन करुन तारळी व उत्तरमांड नदींकरिता १ शाखा आणि उरमोडी नदीवरील कोल्हापूर पध्दतीचे बंधारे व सातारा तालुक्यातील लघु पाटबंधारे तलावांकरिता १ शाखा, अशा २ शाखा कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

३. महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे अंतर्गत धोम पाटबंधारे विभाग, सातारा अंतर्गत सध्याची कृष्णानदी सिंचन शाखा, उंब्रज व कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.५, बोरगाव या शाखांचे विभाजन करुन तारळी व उत्तरमांड उपसासिंचन शाखा, तारळे व लघु पाटबंधारे तलाव व कोल्हापूर पध्दतीचे बंधारे शाखा, सातारा हया शाखा कार्यान्वित करण्यात याव्या. **सदर दोन्ही शाखा हया दिनांक १ ऑक्टोबर, २०११ पासून खालील अटींच्या अधिन राहून कार्यान्वित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

अ) उपरोक्त शाखांसाठी कोणतीही नवीन पदनिर्मिती करता येणार नाही.

ब) उपरोक्त शाखांसाठी सध्या अस्तित्वात असलेल्या मंजूर पदांमधूनच कामे करुन घ्यावी लागतील.

क) मूळ कृष्णानदी उपसासिंचन शाखा, उंब्रजचे अंतर्गत एकूण ८७१० हेक्टर लाभक्षेत्रापैकी तारळी नदीवरील कोल्हापूर पध्दतीचे बंधारे चे सुमारे १३६५ हेक्टर क्षेत्र व उत्तरमांड नदीवरील लधु पाटबंधारे तलाव व कोल्हापूर पध्दतीचे बंधा-याचे सुमारे १३७० हेक्टर क्षेत्र असे एकूण २७३५ हेक्टर क्षेत्र तारळी व उत्तरमांड उपसा सिंचन शाखा, तारळे यांच्याकडे वर्ग करण्यात यावी व उर्वरित ५९७५ हेक्टर लाभक्षेत्राचा कार्यभार कृष्णा नदी उपसासिंचन शाखा, उंब्रज यांच्याकडे कायम राहील.

ड) कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.५, बोरगाव या शाखेकडील एकूण ४९९८ हेक्टर लाभक्षेत्रापैकी उरमोडी नदीवरील ४ कोल्हापूर पध्दतीच्या बंधा-याचे सुमारे १४८४ हेक्टर व सातारा तालुक्यातील ५ लघु पाटबंधारे तलावाचे एकूण सुमारे १८६४ हेक्टर असे एकूण ३३४८ हेक्टर लाभक्षेत्र हे लघु पाटबंधारे व कोल्हापूर पध्दतीचे बंधारे शाखा, सातारा यांच्याकडे वर्ग करण्यात यावी व उर्वरित १६५० हेक्टर लाभक्षेत्राचा कार्यभार कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.५, बोरगाव यांच्याकडे कायम राहील.

४. तारळी व उत्तरमांड सिंचन शाखा, तारळे आणि लघु पाटबंधारे तलाव व को.प.बंधारे शाखा, सातारा यांच्या आस्थापनेचा खर्च अनुक्रमे मुख्य लेखाशिर्ष, २७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे (योजनेतर) (०४(१४) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे (२७०१ अे ०१२) व मुख्य लेखाशिर्ष २७०५, लाभक्षेत्र विकास (योजनेतर) (०२) लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे, आस्थापना (२७०५ ०२४७) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या निधीतून करण्यात यावा.

५. वरील आदेश हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक १०९२/सीआर-८०६/व्यय-६, दि.१५/१०/१९९२ अन्वये विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटरवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०९२९१३०६५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

**( सं.अ.टाटू )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

मा.मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे विकास महामंडळ वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री (लाभक्षेत्र विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,
मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे,
कार्यकारी अभियंता, धोम पाटबंधारे विभाग, सातारा,
कार्यासन अधिकारी, व्यय-१२, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी, आ.(प्रशि.) कार्यासन, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी, आ. (शाखा अभियंता) कार्यासन/जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
लाक्षेवि (आस्था) कार्यासन संग्रहार्थ.